20090831163832001

**सन २००९-२०१० या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने - ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड, जि.ठाणे/ गारगोटी, जि.कोल्हापूर व अमरावती यांना अनुदान वाटप ( दुसरा हप्ता) ( ऑगस्ट ते नोव्हेंबर, २००९)**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमाक :- अनुग्रा २००९/प्र.क्र.४९/योजना-४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :-२८ ऑगस्ट, २००९.**

**संदर्भ:-** १. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांक प्रशिक्षण-२०९३/ प्र.क्र.८४५/०९ दि. १७.०९.१९९३.
२. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण ११९९/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८.
३. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांक अनुग्रा-२००९/ प्र.क्र.४९/योजना-४, दि.२४.४.२००९.

## शासन निर्णय :-

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षाकरिता, मागणी क्रमांक एल-३, "२४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण" या मुख्य लेखाशीर्षाखाली **ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड, जि.ठाणे/ गारगोटी, जिल्हा कोल्हापूर व अमरावती** या केंद्रांसाठी खालीलप्रमाणे तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

( रुपये हजारात)

| अ.क्र | ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र | वेतन(रुपये) | वेतनेतर(रुपये) | एकूण रक्कम रुपये |
|---|---|---|---|---|
| १ | कोसबाड हिल,जि.ठाणे | २,१४१ | ७०० | २,८४१ |
| २ | गारगोटी,जि. कोल्हापूर | ३,२५४ | ७०० | ३,९५४ |
| ३ | अमरावती | २,९८१ | १,००० | ३,९८१ |

वरील वेतनेतर खर्चामध्ये प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, पाहुणे व्याख्याता मानधन, भोजन भत्त्यावरील खर्च, वाहनभाडे इत्यादी बाबींचा समावेश होतो.

२. वरील अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या एकूण तरतूदीमधून संबंधित प्रशिक्षण केंद्रांना वेतन व वेतनेतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी एप्रिल ते जुलै, २००९ या चार महिन्यांच्या कालावधीकरीता अनुक्रमे रुपये ८,५७,०००/-, ११,९३,०००/-, १२,०१,०००/- एवढे अनुदान

संदर्भाधीन दिनांक २४.४.२००९ च्या शासन निर्णयान्वये विहित अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूर करण्यात आले आहे.

३. आता ऑगस्ट ते नोव्हेंबर, २००९ या चार महिन्यांच्या कालावधीसाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे अनुक्रमे **रुपये १३,२८,०००/-, १८,५२,०००/- व रुपये १८,६४,०००/-** एवढी तरतूद दुस-या हप्त्याच्या स्वरुपात वितरीत करण्यात येत आहे. सदरचा खर्च करण्यास प्राचार्य,ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड, जि.ठाणे, गारगोटी, जिल्हा कोल्हापूर व अमरावती यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. प्रशिक्षण केंद्रांना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण- ११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने, सर्व संबंधित उप आयुक्त(आस्था), विकास शाखा, विभागीय आयुक्त कार्यालये यांनी प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याची कार्यवाही कालमर्यादेत करावी. तसेच संदर्भ क्र. १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रांनी खर्च करावा.

४. प्रशिक्षण केंद्रांनी या संदर्भात केलेल्या मासिक खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, प्रशिक्षण कार्यक्रम व प्रशिक्षणार्थ्यांचे साध्य याबाबतची प्रमाणपत्रे सर्व संबंधित विभागीय आयुक्त यांना पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यन्त न चुकता सादर करावीत व विभागीय आयुक्त यांनी मासिक खर्चाची तपासणी करावी.

५. **हा खर्च मागणी क्र.एल-३, "२४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१-पीक संवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (पी) (१) ४१ ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना सहाय्यक अनुदाने - (०१)(०१)ठाणे जिल्हयातील कोसबाड येथे ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे ( २४१५ ०३१ २), ३१,सहाय्यक अनुदान (वेतनेतर ), ३३, अर्थसहाय्य, ३५,सहाय्यक अनुदान ( वेतन ), / (०१)(०२) कोल्हापूर जिल्हयातील गारगोटी येथे ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे ( २४१५ ०३२ १),३१,सहाय्यक अनुदान (वेतनेतर), ३३, अर्थसहाय्य, ३५,सहाय्यक अनुदान (वेतन ), तसेच (०१)(०३) श्री.शिवाजी शिक्षण संस्था,अमरावतीच्या विद्यमाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती याची स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे ( २४१५ ०३३ ९),३१,सहाय्यक अनुदान (वेतनेतर ), ३३, अर्थसहाय्य, ३५,सहाय्यक अनुदान (वेतन)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा** व तो सन २००९-१० या वर्षीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यांत यावा. सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्ची पडतो आहे याची दक्षता घेऊन व

खर्चाचा ताळमेळ घालून सर्व **संबधित विभागीय आयुक्त यांनी याबाबत खातरजमा करावी व तसे शासनास कळवावे.**

६. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वंतत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार यथास्थिती महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१, मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहील व हे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्रे संपूर्ण मदत/सुविधा पुरवतील.

**७. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उपविभाग- एक अंतर्गत असलेल्या मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील तरतूदीनूसार व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५-५-२००९ सोबतच्या परिशिष्टातील अनु.क्र.२७, नियम क्र.१४९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.**

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( रि. इ. शेख )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रत,
विभागीय आयुक्त,कोकण विभाग,नवी मुंबई ,पुणे,अमरावती (प्रत्येकी २ प्रती)
उप आयुक्त (आस्था) विकास शाखा,विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग,नवी मुंबई, पुणे, अमरावती.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, कोल्हापूर, अमरावती
महालेखापाल,(लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१,मुंबई
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी,बाणेर रोड,पुणे
उपमहासंचालक राज्य ग्रामिण विकास संस्था (यशदा) बाणेर रोड, पुणे
वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-५/व्यय-१५
प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड (ठाणे), गारगोटी (कोल्हापूर) , अमरावती
कार्यासन क्र.वित्त-१,वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग (२ ज्यादा पतींसह)
निवड नस्ती का.क्र. योजना-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग

## शासन निर्णय क्रमांक अनुग्रा-२००९/प्र.क्र.४९/योजना-४, दि.२८ ऑगस्ट, २००९ सोबतचे विवरणपत्र

( रुपये हजारात )

| ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्राचे नांव | ऑगस्ट २००९ | | | सप्टेंबर २००९ | | | ऑक्टोबर २००९ | | | नोव्हेंबर २००९ | | | एकूण वितरीत अनुदान | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | वेतन | वेतनेतर | एकूण अनुदान | वेतन | वेतनेतर | एकूण अनुदान | वेतन | वेतनेतर | एकूण अनुदान | वेतन | वेतनेतर | एकूण अनुदान | वेतन | वेतनेतर | एकूण अनुदान |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ |
| कोसबाड हिल, ठाणे | २५० | ८२ | ३३२ | २५० | ८२ | ३३२ | २५० | ८२ | ३३२ | २५० | ८२ | ३३२ | १००० | ३२८ | १३२८ |
| गारगोटी, कोल्हापूर | ३८१ | ८२ | ४६३ | ३८१ | ८२ | ४६३ | ३८१ | ८२ | ४६३ | ३८१ | ८२ | ४६३ | १५२४ | ३२८ | १८५२ |
| शिवाजीनगर, अमरावती | ३४९ | ११७ | ४६६ | ३४९ | ११७ | ४६६ | ३४९ | ११७ | ४६६ | ३४९ | ११७ | ४६६ | १३९६ | ४६८ | १८६४ |
| **एकूण** | **९८०** | **२८१** | **१२६१** | **९८०** | **२८१** | **१२६१** | **९८०** | **२८१** | **१२६१** | **९८०** | **२८१** | **१२६१** | **३९२०** | **११२४** | **५०४४** |

एकूण रुपये ५०,४४,०००/- फक्त (अक्षरी रुपये पन्नास लाख चव्वेचाळीस हजार फक्त )

( रि.इ.शेख )
कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन